**१३ व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकरीता प्राप्त अनुदानाच्या वितरण व विनियोगा बाबतची कार्यपध्दती निश्चित करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. तेविआ २०१०/प्र.क्र.१३१/२०१०/नवि-४.**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२. दिनांक २५ ऑक्टोबर, २०१०.**

वाचा :- (१) वित्त विभागाचे क्र. तेविआ १०१०/प्र.क्र.११/२०१०/वित्त आयोग दि ९.३.२०१० चे पत्र.
(२) केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाच्या वित्त आयोग शाखेचे पत्र क्रमांक १२(२)एफसीडी/२०१० दिनांक २३ सप्टेंबर,२०१०.

प्रस्तावना :-

१३ व्या वित्त आयोगाने राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांसाठी सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षापासून पुढील पाच वर्षांसाठी म्हणजे **सन २०१४-२०१५ पर्यंत सर्वसाधारण मूलभूत अनुदान रु.२०७७.७१ कोटी व सर्वसाधारण कार्यात्मक अनुदान रु.११००.०० कोटी असे एकुण रु.३१७७.७१ कोटीच्या केंद्रीय अनुदानाची शिफारस केलेली आहे.** सदर केंद्रीय अनुदानाच्या वितरणाची व विनियोगाची कार्यपध्दती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :- १३ व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारसीनुसार राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाकरीता प्राप्त होणाऱ्या केंद्रीय अनुदानाच्या वितरणाची व विनियोगाची कार्यपध्दती खालीलप्रमाणे निश्चित करण्यांत येत आहे.

**(I) निधी वितरणाचे निकष :-**

केंद्र शासनाकडून १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारसी प्रमाणे राज्यास नागरी स्थानिक स्वराज्य संस्थासाठी प्रतिवर्षी सर्वसाधारण मूलभूत अनुदान व सर्वसाधारण कार्यात्मक अनुदान खालील प्रमाणे प्राप्त होणार आहे.

| अ क्र | निधी | २०१०-११ | २०११-१२ | २०१२-१३ | २०१३-१४ | २०१४-१५ | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | सर्वसाधारण मूलभूत अनुदान | २९५.९० | ३४३.१० | ४०१.०३ | ४७५.१० | ५६२.५८ | २०७७.७१ |
| २ | सर्वसाधारण कार्यात्मक अनुदान | ०.०० | ११७.३० | २७५.२० | ३२४.६० | ३८२.९० | ११००.०० |
| | **एकुण** | २९५.९० | ४६०.४० | ६७६.२३ | ७९९.७० | ९४५.४८ | ३१७७.७१ |

रोटा/एच-२५७१[१०००-१०-१०]-१

१३ व्या वित्त आयोगाने प्रत्येक राज्यास नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकरीता निधी वितरित करतांना ज्या निकषांचा आधार घेतला आहे त्याचा विचार करुन राज्य शासनाने खालील निकषांचा आधार घेवून राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना १३ व्या वित्त आयोगाचा निधी वितरण करण्यांचा निर्णय घेतला आहे.

**निकष क्रमांक १ (लोकसंख्या) :-**. राज्य शासनाच्या स्तरावरुन नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना १३ व्या वित्त आयोगाचा निधी वितरीत करतांना ५०% निधी त्या त्या महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायतींच्या २००१ च्या लोकसंख्येच्या प्रमाणात वाटप करण्यात येईल.

**निकष क्रमांक २ (क्षेत्रफळ):-** राज्य शासनाच्या स्तरावरुन नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना १३ व्या वित्त आयोगाचा निधी वितरीत करतांना १०% निधी त्या त्या महानगरपालिका/नगरपालिका /नगरपंचायतींच्या क्षेत्रफळाच्या आधारे वाटप करण्यांत येईल.

**निकष क्रमांक ३ (उच्चतम दरडोई उत्पन्ना पासूनची तफावत) :-** १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार प्राप्त निधीच्या २०% निधी हा नगरपरिषदांना/नगरपंचायतींना त्या त्या शहराच्या सरासरी दरडोई उत्पन्नाची राज्यातील उच्चतम दरडोई उत्पन्ना पासूनच्या तफावतीच्या आधारे वितरीत करण्यांत येईल.

**निकष क्रमांक ४ (महसूली सुधारणांकरीता देय निधी ) :-** १३ व्या वित्त आयोगाच्या निधीच्या १५% निधी महसूली सुधार कार्यक्रम राबविण्यासाठी ड-वर्ग महानगरपालिकांना खालील प्रमाणे वितरीत करण्यांत येईल.

१) सन २०१०-११ पासून पुढील पाच वर्षात शासन ज्या ड- वर्ग महानगरपालिका क्षेत्रात जकात कर ऐवजी स्थानिक संस्था कर लागू करेल त्या महानगरपालिकांना स्थानिक संस्था कर लागू झाल्याच्या पहिल्या वर्षी सदर १५% निधीमधुन २/३ निधी त्यांच्या लगत पूर्वीच्या जकात वसुलीच्या प्रमाणात वितरीत करण्यांत येईल.

२) ज्या ड- वर्ग महानगरपालिका आपल्या क्षेत्रात भांडवली मुल्यावर आधारीत मालमत्ता कर आकरणी सुरु करतील त्या ड- वर्ग महानगरपालिकांमध्ये अशा आकारणीच्या पहिल्या वर्षी सदर १५% निधीमधुन १/३ निधी उत्तेजनार्थ वितरीत करण्यांत येईल. एखाद्या वर्षी राज्यातील कोणत्याही महानगरपालिकेने भांडवली मुल्यावर आधारीत मालमत्ता कर प्रणाली लागू केली नाही तर सदर १/३ निधी हा ज्या ड-वर्ग महानगरपालिकांमध्ये त्यावर्षी स्थानिक संस्था कर लागू करण्यांत आला आहे, अशा महानगरपालिकांमध्ये वितरीत करण्यांत येईल.

**निकष क्रमांक ५ (राज्य स्तरावरील सुधार कार्यक्रमांकरीता व विशेष गरजांकरीता देय निधी ):-** १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार प्राप्त झालेल्या निधी पैकी ५% निधीचे वितरण (१) "अ", "ब" व "क" वर्ग महानगरपालिकांना सुधार कार्यक्रम राबविणेसाठी (२) आयुक्त तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना नगरपरिषदां//नगरपंचायतीमध्ये महत्वाचे

सुधार कार्यक्रम राबविण्यासाठी (३) विशेष गरज असणा-या नगरपरिषदां/नगरपंचायतीसाठी करण्यांत येईल. या संदर्भातील विवक्षीत वितरणाची पध्दती निधी वाटपाच्या वेळी शासन स्तरावरुन ठरवून देण्यांत येईल व त्यानुसार अनुदानाचा हप्ता संबंधीतांना वितरीत करण्यांत येईल.

**वरील बाबी विचारात घेऊन राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांसाठी खालील निकषां प्रमाणे १३ व्या वित्त आयोगाच्या निधीचे वितरण करण्यास शासन मान्यता देण्यांत येत आहे.**

| अ.क्र. | निकष | टक्केवारी | निकषा नुसार निधी मिळण्यासाठी पात्र नागरी स्थानिक स्वराज्य संस्था |
|---|---|---|---|
| १ | नागरी लोकसंख्या | ५०% | सर्व नगरपालिका, नगरपंचायती व ड- वर्ग महानगरपालिका |
| २ | नागरी क्षेत्रफळ. | १०% | |
| ३ | क्षेत्रीय दरडोई उत्पन्नाची उच्चतम दरडोई उत्पन्नापासून तफावत | २०% | सर्व नगरपालिका/ नगरपंचायती |
| ४ | महसूली सुधारणा राबविणाऱ्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थासाठी देय निधी | १५% | ड- वर्ग महानगरपालिका |
| ५ | राज्यस्तरावरुन विहीत सुधारणा राबविण्यासाठी आयुक्त तथा संचालक नगरपालिका प्रशासन संचालनालय व अ/ ब/ क वर्ग महानगरपालिका यांच्या करीता तसेच विशेष गरजा असणा-या नगरपालिका व नगरपंचायती यांना देय निधी | ५% | आयुक्त तथा संचालक नगरपालिका प्रशासन संचालनालय, अ, ब व क वर्ग महानगरपालिका, विशेष गरज असणा-या नगरपरिषदा व नगरपंचायती |
| | एकुण | १००% | |

**(II) १३ व्या वित्त आयोगाच्या निधीतून घ्यावयाची अनुज्ञेय कामे :-**

राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना १३ व्या वित्त आयोगांतर्गत प्राप्त होणा-या निधीतून नागरी भागात मूलभूत सोयी सुविधांविषयीची खालील स्वरुपाची कामे घेणे अनुज्ञेय राहील.

**१. घनकचरा व्यवस्थापनः-**

i) घनकचरा व्यवस्थापना अंतर्गत सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) तयार करणे, सदर प्रकल्प अहवालानुसार भांडवली स्वरुपाची कामे करणे (यामध्ये घनकचरा व्यवस्थापनासाठी आवश्यक असलेले घंटागाडी कचराकुंड्या, ढकलगाडी, कंटेनरर्स, कॉम्पॅक्टर्स, ट्रॅक्टर ट्रॉली, इत्यादी वाहने व इतर आवश्यक साहित्य शासनाच्या विहीत कार्यपध्दतीनुसार खरेदी करणे, तसेच

**क्षेपणभूमींवर घनकचरा प्रक्रिया संयंत्र उभारणे व शास्त्रोक्त पध्दतीने क्षेपणभूमीचा विकास करणे यांचा समावेश असेल)**

ii) घनकचरा व्यवस्थापनांतर्गत कंत्राटदारामार्फत किंवा सार्वजनिक खाजगी सहभागाअंतर्गत करण्यात येणाऱ्या बाबींपोटी होणारा खर्च देखील १३ व्या वित्त आयोगाच्या निधीतून अनुज्ञेय राहिल.

**२. पाणी पुरवठा व स्वच्छता:-**

i) पाणी पुरवठा व मलनिःसारण व्यवस्थेचे बळकटीकरण / विस्तारीकरण करणे

ii) शासनाने मंजूर केलेल्या पाणी पुरवठा व मलनिस्सारण योजनांकरीता नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानी भरावयाची लोक वर्गणी

iii) पाणी पुरवठा व मलनिःसारण व्यवस्थे अंतर्गत करावयाच्या खालील सुधारणा (Reforms) वरील खर्च.

अ) पाणी लेखा परिक्षण ब) उर्जा लेखा परिक्षण क) वैयक्तीक नळ जोडणीस पाण्याचे मीटर बसविणे.

iv) शहर हागणदारी मुक्त (Open Defecation Free) करण्यासाठी करावा लागणारा खर्च.

v) शहरातील कमीत कमी २० % सांडपाण्याचा पुर्नवापर / पुर्नचक्रीकरण करण्यांसाठी लागणारा खर्च

vi) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडील पाणी पट्टी व वीज बिले (दंड सोडून ) भरण्याचा खर्च.

**३. सामाजिक पायाभूत सुविधांचा विकास:-**

i) विकास आराखडयातील आरक्षणे विकसीत करणे व त्यासाठी भूसंपादन करणे.

ii) रुग्णालय इमारत बांधणे, रुग्णालयासाठी आवश्यक उपकरणे व रुग्ण वाहिका खरेदी करणे.

iii) अंगणवाडी / बालवाडी बांधणे.

iv) नाट्यगृह / प्रेक्षागृह बांधणे तसेच क्रिडांगणाचा विकास करणे.

v) स्मशानभूमीचा विकास करणे.

vi) आधार केंद्र स्थापन करणे.

vii) श्रम साफल्य योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सेवेतील सफाई कामगारांची सेवा निवासस्थाने बांधणे.

viii) अग्निशमन वाहने/उपकरणे व इतर यंत्रसामुग्री खरेदी करणे.

ix) अग्निशमन कर्मचाऱ्यांसाठी सेवा निवासस्थान बांधणे.

x) नगरपालिकेची प्रशासकिय इमारत बांधणे व त्याअंतर्गत साजेशी आंतरिक संरचनात्मक व्यवस्था तयार करणे.

**४. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये राबवयाचे सुधारणा विषयक कार्यक्रम:-**

i) केंद्र व राज्य शासनाच्या अभियानांतर्गत विहीत केलेल्या विविध सुधारणा (Reforms) (उदा. जीआयएस, ई- गव्हर्नन्स, द्वि नोंद लेखा पध्दती इत्यादी.) राबविण्याकरीता येणारा खर्च करणे.

ii) शासनाच्या नागरी ई-गव्हर्नन्स प्रकल्पांतर्गत नगरपरिषदेचा हिस्सा भरणे तसेच नगरपरिषद कामकाजाचे संगणकीकरण करण्याकरीता लागणारा इतर खर्च भागविणे.

iii) सर्व्हीस लेव्हल बेंचमार्कींग प्रणाली कार्यन्वित करण्यासाठीचा खर्च

iv) ऊर्जा बचतीवरील उपाय योजना करणे

v) पर्जन्यजल संचय राबविणे व त्याबाबत नागरीकांना प्रोत्साहन देणे.

**५. महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेच्या सुवर्ण जंयती निमित्त घ्यावयाचे उपक्रम:-**

i) "सुवर्ण जयंती उद्यान" म्हणून एक सार्वजनिक उद्यान विकसित करणे

ii) "सुवर्ण जयंती तलाव" म्हणून एक सार्वजनिक तलावाचे सौंदर्यीकरण करणे

iii) "सुवर्ण जयंती पथ" म्हणून शहरातील एक प्रमुख रस्ता एकात्मिक पध्दतीने विकसित करणे

iv) "सुवर्ण जयंती क्रीडांगण/स्टेडीयम" म्हणून एक क्रिडांगण / स्टेडियम बांधणे

v) "सुवर्ण जयंती सभागृह / प्रेक्षागृह" म्हणून एक सभागृह / प्रेक्षागृह बांधणे

**६. इतर अनुज्ञेय कामे :-**

i) केंद्र व राज्य योजनांतर्गत मंजुर पायाभूत सुविधा व आवास प्रकल्पांवरील लोकवर्गणी (महानगरपालिका / नगरपरिषदेचा हिस्सा) या वरील खर्च व असे प्रकल्प पूर्ण करण्याकामी आवश्यक ठरणारा अतिरिक्त खर्च.

ii) शहराच्या दिर्घकालीन नियोजनावर आधारित शहर विकास आराखडा (सी.डी.पी) तयार करणे, विविध पायाभूत प्रकल्पांचे सविस्तर प्रकल्प अहवाल (डी.पी.आर)/ निविदा दस्तावेज/ करारनामा दस्तावेज इत्यादी तयार करण्यांवरील खर्च.

iii) शासन/भारतीय आयुर्विमा महामंडळ/ हुडको इत्यादी वित्तीय संस्थाकडून महानगरपालिका/नगरपरिषदेने घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यांसाठीचा होणारा खर्च. सदर कर्जाची परतफेड संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी केली नाही तर त्या नागरी स्थानिक

स्वराज्य संस्थांना १३ व्या वित्त आयोगाच्या देय निधीतून शासन अशा कर्जाच्या परतफेडी करीता आवश्यक रक्कम परस्पर वळती करु शकेल.

iv) शहर पर्यावरण स्थिती दर्शक अहवाल तयार करणे.

v) शहर स्वच्छता आराखडा ( सिटी सॅनिटेशन प्लॅन) तयार करणे.

vi) सार्वजनिक-खाजगी सहभागातून (P.P.P द्वारे) राबविल्या जाणा-या प्रकल्पांसाठीचा वर्धनक्षमता तफावत निधी (Viability Gap Fund) देणे.

vi) महानगरपालिका / नगरपालिका कर्मचारी अधिकाऱ्यांचे प्रशिक्षण / कौशल्य वृध्दीसाठी उपाययोजना करण्यांवरील खर्च.

vii) ज्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांची आर्थिक परिस्थिती नाजूक असून खूपच खालावलेली आहे, त्यांच्याबाबतीत १३ व्या वित्त आयोगाच्या निधीतून " विशेष बाब " म्हणून शासन मान्यतेने खालील बाबींकरिता निधी विनियोगात आणण्यास परवानगी देता येईल.

अ) प्रगती पथावरील भांडवली स्वरुपाच्या कामांवरील थकीत देयके अदा करणे.

ब) कर्मचा-यांचे थकीत वेतन / सेवानिवृत्ती वेतन अदा करणे.

**७. १३ व्या वित्त आयोगांतर्गत "अ", "ब" व "क" वर्ग महानगरपालिकांना व संचालक नगरपारिषद प्रशासन संचलनालय यांना देय रक्कमेतुन अनुज्ञेय कामेः-**

**अ)** तेराव्या वित्त आयोगांतर्गत "अ", "ब" व "क" वर्ग महानगरपालिकांना देण्यांत येणा-या निधीतून खालील कामे अनुज्ञेय राहतील.

१) अग्निशमन प्रतिसाद व नियंत्रण आराखडा (फायर हॅझार्ड रिस्पोन्स अॅण्ड मेटीगेशन प्लॅन) तयार करणे व त्याची अंमलबजावणी करणे

२) सर्व्हीस लेव्हल बेंचमार्कींग प्रणाली कार्यन्वित करणे.

३) ऊर्जा बचतीवरील उपाय योजना करणे.

४) पर्जन्यजल संचय विषयक उपाययोजना राबविणे व त्याबाबत नागरीकांना प्रोत्साहन देणे.

५) महानगरपालिका कर्मचारी अधिकाऱ्यांचे प्रशिक्षण / कौशल्य वृध्दीसाठी उपाययोजना करणे.

६) शहर स्वच्छता आराखडा ( सिटी सॅनिटेशन प्लॅन) तयार करणे.

**ब)** आयुक्त तथा संचालक नगरपालिका प्रशासन संचालनालय यांच्या स्तरावरील निधीतून राज्यस्तरावरुन करावयाच्या पुढील सुधारणांवरील खर्च अनुज्ञेय राहील. १) नगरपरिषदांचे नगरभूमापन करणे २) नगरपरिषदांमध्ये व्दिनोंद लेखापध्दतीची अंमलबजावणी करणे.

**३) नगरपरिषदांमध्ये जी. आय. एस. पध्दती राबविणे ४) नगरपरिषदांमध्ये सर्व्हीस लेव्हल बेंचमार्कींग प्रणाली कार्यान्वित करणे ५) नगरपालिकांच्या कामकाजाच्या संगणकीकरणासाठी आवश्यक उपाययोजना करणे ६) शासन विहीत करेल असे इतर सुधार कार्यक्रम राबविणे इत्यादी.**

**याशिवाय आयुक्त तथा संचालक नगरपालिका प्रशासन संचालनालय यांच्याकडे सुपूर्द केलेल्या निधीपैकी** काही निधी शासनाच्या निर्देशानुसार नगर परिषदा/नगरपंचायतींच्या विशेष गरजा भागविण्यासाठी उपलब्ध करून देता येईल.

**(III ) १३ व्या वित्त आयोगाच्या निधीचा विनियोगाची कार्यपध्दती :-**

**१. प्रस्ताव सादर करण्याची कार्यपध्दती :-** १३ व्या वित्त आयोगाअंतर्गत प्राप्त झालेल्या निधीचा विनियोग समयमर्यादित करावयाचा असल्याने संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने शासनाकडून निधी प्राप्त झाल्या नंतर लवकरात लवकर १३ व्या वित्त आयोगाच्या निधीतून प्रस्तावित कामांसाठी "निवड" व "निश्चिती" करणारा ठराव करुन, सदर कामांना सक्षम प्राधिका-यांकडून तांत्रिक मंजुरी घेऊनच सक्षम प्राधिका-याकडे प्रशासकीय मंजुरीसाठी प्रस्ताव सादर करावा. सदर निधीतून कामे प्रस्तावित करतांना महानगरपालिका व नगरपरिषदा/नगरपंचायती यांनी या शासन निर्णयातील भाग II मधील अनुज्ञेय कामांमधून योग्यती कामे स्थानिक परिस्थितीनुसार हाती घ्यावी.

**२. प्रशासकीय मंजुरीची कार्यपध्दती :-**

**अ)** १३ व्या वित्त आयोगाच्या निधीअंतर्गत नगरपरिषदा व नगरपंचायतींच्या कामांच्या प्रस्तावांना प्रशासकिय मंजूरी देण्याचे अधिकार संबंधित जिल्हाधिकारी यांना असतील. **नगरपरिषदा व नगरपंचायतीकडून कामांचे प्रस्ताव ठरावासह प्राप्त झाल्या नंतर जिल्हाधिकारी यांनी खालील बाबींची पूर्तता झाल्याची खात्री करुन प्रस्ताव प्राप्त झाल्यापासून <u>१५ दिवसांत</u> नगरपरिषदा/नगरपंचायतींच्या प्रस्तांवाना प्रशासकीय मंजूरी द्यावी.**

(१) प्रस्तावित कामे ही १३ व्या वित्त आयोगाअंतर्गत अनुज्ञेय असलेल्या कामांपैकीच असावी.

(२) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थने सर्वसाधारण सभेच्या ठरावान्वये संबंधित कामाची शिफारस केली असावी.

(३) सदर कामांना सक्षम प्राधिकरणाची तांत्रिक मंजूरी असणे आवश्यक आहे.

(४) ज्या प्रस्तावात बांधकामे अंतर्भुत आहेत अशा कामांच्या बाबतीत प्रस्तावित बांधकामाखालील जमिनीची मालकी संबंधीत स्थानिक स्वराज्य संस्थेची असल्या बाबतचे अधिकार अभिलेख सादर करणे अनिवार्य राहील.

(५) सदर प्रस्तावातील बांधकामे ही शहराच्या विकास आराखडयाशी सुसंगत आहेत किंवा कसे या बाबतचे नगर रचना कार्यालयाचे प्रमाणपत्र घेणे बंधनकारक असेल.

(६) अग्निशमन वाहने/उपकरणे व इतर अग्निशमन यंत्रसामुग्री खरेदी करतांना संचालक अग्निशमन सेवा यांची तांत्रिक मान्यता घेणे आवश्यक राहिल.

नगरपरिषदेने/नगरपंचायतीने जिल्हाधिकारी यांचेकडून प्रशासकीय मंजुरी प्राप्त झाल्यानंतर विहित **कार्यपध्दतीचा अवलंब करुन तातडीने सदरहू अनुदानाचा विनियोग करावा.**

**ब)** महानगरपालिकांच्या बाबतीत प्रशासकीय मंजूरीचे अधिकार संबंधित महानगरपालिकेच्या आयुक्तांना असतील. त्यांनी खालील बाबीची पूर्तता होत असल्याची खात्री करुन मगच प्रस्तावित कामांना **१५ दिवसांत** प्रशासकीय मंजूरी द्यावी.

(१) प्रस्तावित कामे ही १३ व्या वित्त आयोगाअंतर्गत अनुज्ञेय असलेल्या कामांपैकीच असावी.

(२) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थने सर्वसाधारण सभेच्या ठरावान्वये संबंधित कामाची शिफारस केलेली असावी.

(३) सदर कामांना सक्षम प्राधिकरणाची तांत्रिक मंजूरी असणे आवश्यव आहे.

(४) ज्या प्रस्तावात बांधकामे अंतर्भुत आहेत अशा कामांच्या बाबतीत प्रस्तावित बांधकामाखालील जमिनीची मालकी महानगरपालिकेची असल्या बाबतची नोंद अधिकार अभिलेखात असणे आवश्यक राहील.

(५) सदर प्रस्तावातील बांधकामे ही शहराच्या विकास आराखडयानुसार सुसंगत आहेत किंवा कसे या बाबतचे नगर रचना शाखेचे प्रमाणपत्र घेणे बंधनकारक असेल.

(६) अग्निशमन वाहने/उपकरणे व इतर अग्निशमन यंत्रसामुग्री खरेदी करतांना संचालक अग्निशमन सेवा यांची तांत्रिक मंजूरी घेणे आवश्यक राहिल.

महानगरपालिकेला प्राप्त झालेल्या १३ व्या वित्त आयोगाच्या अनुदानाचा विनियोग समयमर्यादित कालावधीमध्ये विहित प्रयोजनासाठीच होईल हे पाहण्याची जबाबदारी संबंधित महानगरपालिकाआयुक्त यांची राहील.

**क) (१)** नागरी भागातील सर्व जमिनींचे भूमापनाचे काम पूर्ण करण्यासाठी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना आवश्यकतेप्रमाणे अनुदान देण्यात येईल. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी सदर निधी हा जमाबंदी आयुक्त यांना किंवा त्याच्या सल्ल्यानुसार विभागीय आयुक्त किंवा संबंधीत यंत्रणेला वितरीत करावा.

(२) राज्यस्तरावरुन राबविण्यांत येणा-या सुधारणांविषयक कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्यांकरीता निधी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना सुपूर्त करण्यांत येईल. त्याचा विनियोग प्रचलित वित्तीय नियमावली नुसार व विहीत कार्यपध्दती अवलंबून करण्यात यावा.

**३)** शासन/भारतीय आयुर्विमा महामंडळ/ हुडको इत्यादी वित्तीय संस्थाकडून महानगरपालिका/नगरपरिषदा/नगरपंचायतीनी घेतलेल्या कर्जाची परतफेड संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी केली नाही तर त्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना १३ व्या वित्त आयोगाच्या देय निधीतून कर्जाच्या परतफेडी करीता शासन स्तरावरुन सदर रक्कम वळती करण्यांत येईल.

**(IV) निधी वितरण विषयक कार्यप्रणाली :-**

१३ व्या वित्त आयोगाअंतर्गत प्राप्त होणारे अनुदान हे शासनाकडून संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस **भारतीय रिझर्व्ह बँकेमार्फत इलेक्ट्रॉनिक ट्रान्सफर सिस्टीमचा वापर करुन एन.इ.एफ.टी. किंवा एन.इ.सी.एस. सुविधाद्वारे संबंधित महानगरपालिका/नगरपालिका नगरपंचायतीच्या बँक खात्यामध्ये थेट जमा करण्यात येणार आहे.** एन.इ.एफ.टी. द्वारे प्रदान करण्यासाठी बँकेच्या आय.एफ.एस.कोड (इंडियन फायनान्सियल सिस्टीम कोड) संकेतांकाची आवश्यकता असते. व एन.इ.सी.एस. द्वारे प्रदान करण्यासाठी बँकेच्या एम.आय.सी.आर. (मॅग्नेटीक इंक कॅरेक्टर रेकग्निशन कोड) संकेतांकाची आवश्यकता असते. त्या करीता सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानी १३ व्या वित्त आयोगाच्या निधी करीता राष्ट्रीयकृत बँकेच्या ज्या शाखांना **आय.एफ.एस.कोड व एम.आय.सी.आर.** कोड आहेत, अशाच स्थानिक बँक शाखेमध्ये स्वतंत्र खाते उघडणे व सदरच्या खाते क्रमांकासह तपशिलवार माहिती अविलंब शासनास कळविणे बंधनकारक राहिल. **तेराव्या वित्त आयोगाच्या अनुदानाचा हप्ता वरीलप्रमाणे वितरीत केल्यानंतर संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने ज्या राष्ट्रीयकृत बँकेच्या शाखेत खाते उघडलेले आहे त्या शाखेच्या व्यवस्थापकाने संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस निधी जमा झाल्याबाबत तात्काळ ई- मेल व पत्राद्वारे कळविणे आवश्यक राहिल. तदूनंतर संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने सदर निधी प्राप्त झाल्याची लेखी पुष्टी तात्काळ ई- मेल व पत्राद्वारे शासनास करणे बंधनकारक राहिल.**

**(V) विनियोग प्रमाणपत्र सादर करणे :-**

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी शासनाकडून निधी प्राप्त झाल्यानंतर ४ महिन्यात झालेल्या खर्चाच्या आधारे विनियोग प्रमाणपत्र सोबत जोडलेल्या विहित विवरणपत्रात संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना सादर करावे **व सदर विनियोग प्रमाणपत्र सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून संकलित करून संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी शासनास सादर करावे. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी वरीलप्रमाणे विनियोग प्रमाणपत्र आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना सादर केले नाही तर ते निधीचा विनियोग करण्यास सक्षम नाहीत, असे समजून सदर निधी ज्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी निधीचा विहित कालावधीत विनियोग केला आहे, अशा गरजू नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना देण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.**

**(VI)** १३ व्या वित्त आयोगाअंतर्गत केंद्र शासनाकडून अनुदान प्राप्त होणाऱ्या पहिल्या आर्थिक वर्षातील निधीचे विनियोग प्रमाणपत्र केंद्र शासनास सादर केल्यानंतरच पुढील आर्थिक वर्षातील अनुदान केंद्र शासनाकडून प्राप्त होणार आहे. त्यामुळे केंद्रीय अनुदानाचा तातडीने विनियोग करुन अधिकाधिक केंद्रीय अनुदान प्राप्त होण्याच्या दृष्टीने, विनियोग समयमर्यादित कालावधीत करण्याची जबाबदारी संबंधित आयुक्त महानगरपालिका व मुख्याधिकारी नगरपरिषद/ नगरपंचायत यांची राहिल. तसेच जिल्ह्यांमध्ये १३ व्या वित्त आयोगाअंतर्गत प्राप्त झालेल्या निधीचा विनियोग समयमर्यादित व प्रभावी रित्या होत आहे किंवा कसे यावर संनियंत्रणाची जबाबदारी जिल्हाधिकारी यांच्यावर सोपविण्यात येत आहे. त्यामुळे १३ व्या वित्त आयोगांतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना वितरीत करण्यात आलेल्या निधीचा विनियोग विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन व मार्गदर्शक तत्त्वानुसार होईल, याची खबरदारी संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.

**(VII) १३ व्या वित्त आयोगाच्या निधीतून हाती घेण्यात आलेल्या योजनांच्या अंमलबजावणीचा आढावा घेणे :-**

शासनाने विहित केलेल्या उपरोक्त कार्यपध्दतीचे सर्व संबंधितांनी काटेकोरपणे पालन करावे. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय तसेच विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक नगरपालिका प्रशासन यांनी त्यांच्या विभागीय बैठकीत तसेच जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या स्तरावर होणा-या बैठकीत या निधीतून घेण्यात आलेल्या योजनांच्या अंमलबजावणीचा आढावा घेवून याबाबतचा अहवाल तसेच विनियोग प्रमाणपत्र शासनास त्वरीत सादर करण्याची दक्षता घ्यावी.

सदरहू शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्रमांक ४७/२०१० /वित्त आयोग, दिनांक २०/८/२०१० अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यांत आला असुन त्याचा सांकेतांक क्रमांक २०१०१०२५१९४१२८७०१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( मनु कुमार श्रीवास्तव )**
**सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/सचिव.
२) मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय.
७) संचालक, नगर रचना ,पुणे
८) अग्निशमन सल्लागार, राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, कोळे कल्याण, मुंबई.
९) महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११) सर्व विभागीय आयुक्त.
१२) सर्व जिल्हाधिकारी.
१३) आयुक्त, सर्व महानगरपालिका.
१४) मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका/नगरपंचायती
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१६) प्रधान सचिव (१) व (२), नगर विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक.
१७) सर्व सह सचिव / उपसचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) सर्व अवर सचिव/कक्ष अधिकार, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) निवड नस्ती, नवि-४ कार्यासन, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

Annex –V

**CONSOLIDATED INFORMATION ON ALLOCATION AND RELEASE OF THE LOCAL BODIES GRANT RECOMMENDED BY THIRTEENTH FINANCE COMMISSION FOR ULBs FOR THE 1st /2nd INSTALMENT FOR YEAR 20....AND FOR CUMULATIVE INSTALMENTS RELEASED**

Part-A: - General Information

1. Whether elections to ULBs have been held (Yes/No)

2. Devolution of functions/powers, functionaries/personnel and resources/funds to local bodies as envisaged in Schedule XII of the Constitution:

| Sl.no. | Matters transferred with: | Information as at end of the last Financial year. |
|---|---|---|
| 1. | Functions/powers | List (may be attached on separate sheet) |
| 2. | Functionaries/personnel | Number |
| 3. | Resources/funds | Amount (Rs.Lakh) |

Part-B: – Detailed break up of Allocation/Releases (Rs. Lakh)

| Sl. no. | | 1st /2nd instalment of year 20.... * | | | | Cumulative 2010-15 | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | Basic Grant | Performance Grant | Total | Date | Basic Grant | Performance Grant | Total |
| 1. | Local Bodies Grants received from the Centre | | | | | | | |
| 2. | Grants released to local bodies | | | | | | | |
| 3. | Grants released as percentage of grant received from Central Govt. | | | | | | | |

* Please out strike whichever not applicable

Part-C: Break-up of grant spent by Local Bodies Grants (Rs. Lakh)

| Sl.no. | Particulars | Last instalment | | Cumulative | |
|---|---|---|---|---|---|
| | | Amount | % of Total | Amount | % of Total |
| 1 | Water Supply | | | | |
| 2 | Sanitation | | | | |
| 3 | Solid Waste Management | | | | |
| 4 | Drainage | | | | |
| 5 | E-governance | | | | |
| 6 | Transportation | | | | |
| 7 | Salary and wages | | | | |
| 8 | Strengthening fire services | | | | |
| 9. | Strengthening local fund audit department | | | | |
| 10 | Others | | | | |
| | Total | | | | |

3. Certified that the Local Body Grants have been electronically transferred to the elected local bodies within 5 days, from the date of release of grants by the Central Govt. / within 10 days through alternative channels where easily accessible banking channels are not available.

FINANCE SECRETARY, GOVERNMENT OF_____



-------